**वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर संलग्न प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती), खोपोली संस्थेच्या जुन्या इमारतींची दुरुस्ती करण्याकरिता व ग्रंथालय बांधकाम यासाठी सन २०२२-२३ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम), लेखाशिर्ष २४०१ २६४९ या अंतर्गत रु. १३९.७४०२१ लक्ष निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२०/प्र.क्र.२०५/३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०८ मार्च, २०२३

<u>वाचा</u> :

१. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल यांचे पत्र क्र.सा.बां.वि. पनवेल/१२३१/सन-२०२१, दि.३१.०३.२०२१
२. संचालक, वनामती यांचे पत्र क्र. वनामती/बांधकाम/निधी मागणी/४१०९/२०२२, दि.१५.११.२०२२
३. संचालक(आत्मा), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. कृआ.पुणे/नस्ती/आत्मा(वि.प्र.५)शाखा/प्र.क्र.३/३८८०३/२२, दि. १८.११.२०२२
४ . संचालक, वनामती यांचे पत्र क्र. जा./क्र.वनामती/बांधकाम/रा.खो./८५८/२०२३,दि.०३.०३.२०२३

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील कृषि विकास घटकाचे महत्व लक्षात घेऊन कृषि आणि कृषिशी निगडीत विषयाबाबत अद्यावत प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने नागपूर येथे वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, ही संस्था शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आली आणि राज्यातील नागपूर, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नाशिक, कोल्हापूर व खोपोली येथील सात प्रशिक्षण संस्था या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या सहकारी व संलग्न संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या आहेत. दिनांक १७ जुलै,२००१ च्या शासन निर्णयानुसार नागपूर येथील शिखर प्रशिक्षण संस्था आणि तिच्या विभागीय सात संलग्न संस्था स्वायत्त संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या.

रामेती खोपोली संस्थेच्या इमारतींचे बांधकाम सन १९५८ ते १९७४ या काळात झालेले असल्याने त्या फार जुन्या झाल्या असुन त्यांची दुरूस्ती करणे अत्यावश्यक आहे. सदर इमारतींची दुरूस्ती व ग्रंथालय बांधकामासाठी रु.१३९,७४,०२१/- निधी उपलब्ध करुन देणेबाबत संचालक, वनामती यांनी संदर्भाधीन दि.१५.११.२०२२ रोजीच्या पत्रान्वये संचालक(आत्मा) यांना प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने संचालक(आत्मा) यांनी संदर्भाधीन दि. १८.११.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सदर प्रकरणी **रु. १३९.७४०२१ लक्ष** निधी

उपलब्ध देण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल यांच्याकडून संदर्भाधीन दि.३१.०३.२०२१ रोजीच्या पत्रान्वये सदर बांधकाम कामांसाठी, स्थापत्य व विदयुत कामाचे अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता देण्यात आल्याचे संचालक, वनामती यांनी संदर्भाधीन दि.१५.११.२०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. तसेच संचालक,वनामती यांचेकडून संदर्भाधीन दि. ०३.०३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सदर बांधकामासाठी मुख्य अभियंता सा. बां. प्रादेशिक विभाग, कोकण, मुंबई यांची स्थापत्य कामाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता देण्यात आल्याचे संचालक,वनामती यांनी कळविले आहे.

सन २०२२-२३ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम), लेखाशिर्ष २४०१ २६४९ या अंतर्गत रु.६००.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे.

त्यानुषंगाने वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर संलग्न प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती), खोपोली संस्थेच्या जुन्या इमारतींची दुरुस्ती करण्याकरिता व ग्रंथालय बांधकाम यासाठी सन २०२२-२३ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम), लेखाशिर्ष २४०१ २६४९ या अंतर्गत **रु. १३९.७४०२१ लक्ष** निधी उपलब्ध करुन देण्याकरीता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**<u>शासन निर्णय :-</u>**

१. प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती), खोपोली संस्थेच्या संस्थेच्या जुन्या इमारतींची दुरुस्ती करण्याकरिता व ग्रंथालय बांधकाम यासाठी सन २०२२-२३ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम), लेखाशिर्ष २४०१ २६४९ या अंतर्गत **रु.१३९.७४०२२ लक्ष निधी (एकूण रुपये एक कोटी एकोणचाळीस लक्ष चौ-याहत्तर हजार एकवीस फक्त)** उपलब्ध करुन देण्याकरीता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर बांधकामांबाबतचा प्रशासकीय मान्यतेचा सविस्तर बाबनिहाय गोषवारा सोबत जोडलेल्या “परिशिष्ट अ” प्रमाणे आहे.

२. सदर प्रकरणाचा निधी **रु.१३९.७४०२१ लक्ष निधी (एकूण रुपये एक कोटी एकोणचाळीस लक्ष चौ-याहत्तर हजार एकवीस फक्त)** चालू वर्षी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. डी-३, २४०१, पीक संवर्धन, १०९ विस्तार व प्रशिक्षण, (०१)(४७) वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ( २४०१ २६४९ )**

३. मंजुर केलेला **रु.१३९.७४०२१ लक्ष निधी (एकूण रुपये एक कोटी एकोणचाळीस लक्ष चौ-याहत्तर हजार एकवीस फक्त)** निधी वितरणासाठी व संनियंत्रण करण्याच्या दृष्टीने पुढील अधिका-यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | वनामती स्तर | संचालक वनामती,नागपूर | वनामती नागपूर कार्यालयातील वरिष्ठ प्रशासन नि. लेखा अधिकारी. |

४. सदर वितरीत निधीच्या अंतर्गत झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाकडे सादर करण्याची कार्यवाही संचालक(आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४४१/कार्यासन १४३१, दि.१५/१२/२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.०६/२०२३/व्यय१, दि.०५/०१/२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०८१७१५४३४५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.03.08 19:17:28 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति-**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
४. आयुक्त (कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर

६. संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

७. सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,

९. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड

१०.सर्व विभागीय कृषी सह संचालक

११.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,

१२. प्राचार्य, रामेती खोपोली

१३. सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,

१४. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई-३२

१५. नियोजन विभाग का.१४३२, मंत्रालय, मुंबई-३२

१६. निवड नस्ती ३-अे.

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२०/प्र.क्र.२०५/३-अे, दि. ८ मार्च, २०२३ सोबतचे प्रपत्र.**
**"परिशिष्ट अ"**

**रामेती खोपोली संस्थेच्या परिसरातील विविध इमारतींची दुरुस्ती करण्याकरिता लागणा-या निधीचा तपशील**

| अ.क्र. | बांधकामाचे नाव | अंदाजित रक्कम (रु.) |
|---|---|---|
| १ | रामेती खोपोली संस्थेच्या पाताळगंगा निवासस्थानाची विशेष दुरुस्ती करणे, ता. खालापूर, जि. रायगड | ११,७४,४६७/- |
| २ | रामेती खोपोली संस्थेच्या यमुना निवासस्थानाची विशेष दुरुस्ती करणे ता. खालापूर, जि. रायगड | ६,६७,९६७/- |
| ३ | रामेती खोपोली संस्थेच्या वसतीगृह इमारतीची विशेष दुरुस्ती करणे ता. खालापूर, जि. रायगड | ६३,४९,६७०/- |
| ४ | रामेती खोपोली संस्थेच्या रायगड निवासस्थानाची विशेष दुरुस्ती करणे ता. खालापूर, जि. रायगड | १२,६३,१९८/- |
| ५ | रामेती खोपोली संस्थेच्या सुधागड निवासस्थानाची विशेष दुरुस्ती करणे ता. खालापूर, जि. रायगड | १०,२९,५०७/- |
| ६ | रामेती खोपोली संस्थेच्या वर्ग-४ निवासस्थानाची विशेष दुरुस्ती करणे ता. खालापूर, जि. रायगड | ४,०८,११८/- |
| ७ | रामेती खोपोली संस्थेतील ग्रंथालयाचे बांधकाम करणे ता. खालापूर, जि. रायगड | ३०,८१,०९४/- |
| | **एकूण** | **१,३९,७४,०२१/-** |